उप अभियंता (स्थापत्य) यांची
बदली / पदस्थापना

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस २०१७/प्र.क्र.९७/सेवा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १७.५.२०१७

वाचा- शासन आदेश क्रमांक- एस-९२/१११६/प्र.क्र.२०/ सेवा-६ (ड), दिनांक २४.०३.२०१७

## शासन आदेश

श्री. भगवान रामचंद्र शेवाळे, उप अभियंता यांना शासन आदेश क्रमांक- एस-९२/१११६/प्र.क्र.२०/ सेवा-६ (ड), दिनांक २४.०३.२०१७ अन्वये शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात आले आहे. श्री. भगवान रामचंद्र शेवाळे, उप अभियंता यांना शासन सेवेत पुन:स्थापित केल्यानंतर त्यांना पदस्थापना देणे आवश्यक असल्याने, त्यांची पदस्थापना सहायक अधीक्षक अभियंता, सा.बां. मंडळ, रत्नागिरी या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. भगवान रामचंद्र शेवाळे, उप अभियंता (स्थापत्य) यांना नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यास सांगावे.

३. श्री. शेवाळे यांनी त्यांच्या पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा, त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल, तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही, याची जाणीव त्यांना करुन देण्यात येत आहे. तसेच त्यांचे लक्ष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ कडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांना देण्यात आलेली पदस्थापना रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील याचीही त्यांनी नोंद घ्यावी.

४. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदमोचन अधिकाऱ्यांनी पदभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहीत कालावधीत संबंधित अधिकारी पदस्थापनेचे ठिकाणी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणे करुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार पदस्थापना देण्यात आलेल्या अधिकाऱ्याचा रजेचा अर्ज स्वीकारु नये/ मंजूर करु नये.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१७१५१००२७०१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Arvind J Kamble

Digitally signed by Arvind J Kamble
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c7145f142d7f8e597c7957f95eeba7e16ac871e58cfc3b203f7c1273111cfb15, cn=Arvind J Kamble
Date: 2017.05.17 15:13:46 +05'30'

**(अ.ज. कांबळे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. महालेखापाल, १ / २ ( लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य , मुंबई/नागपूर.
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद/मुंबई.
३. जिल्हा कोषागार अधिकारी, जालना/रत्नागिरी
४. श्री. भगवान रामचंद्र शेवाळे, उप अभियंता यांना मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद यांच्या मार्फत.
५. खाजगी सचिव, मा. मंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून) /मा.मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम)/ मा.राज्यमंत्री (सा. बां.) (सार्वजनिक उपक्रम वगळून)/मा. राज्यमंत्री (सा.बां.), (सार्वजनिक उपक्रम), मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव (सा.बां.वि.)/सचिव (बांधकामे / रस्ते) यांचे स्वीय सहायक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. निवडनस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, सेवा-२.